एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१०
राज्यसेवा (मुख्य) परिक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट-ब संवर्गातील उमेदवारांच्या परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत व त्यांच्या वेतनाबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः- कअस १३२५/प्र.क्र.३३/प्रशा-२
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५

संदर्भः-

१)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दिनांक २१.०७.२०१७
४) सामान्य प्रशासन विभाग कार्यालयीन आदेश क्र.टिआरएन -११२४/प्र.क्र.८४/प्रशि-३, दिनांक २१.०२.२०२५
५) वनामती, नागपूर याचे पत्र क्र.आस्था-०३२५/सीपीटीपी-१०/११०१/२०२५, दिनांक ०३.०४.२०२५

प्रस्तावनाः-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सन-२०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येते. त्यानुसार मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट-ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णयः-

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाद्वारे राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारसप्राप्त ठरलेल्या ५ उमेदवारांना संदर्भाधिन क्रमांक ४ च्या कार्यालयीन आदेशान्वये दिनांक ०२.०४.२०२५ पासून दोन वर्षाच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० अंतर्गत

परिवीक्षाधीन कक्ष अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली आहे. त्यापैकी खालील ३ उमेदवार वनामती, नागपूर येथे दि.०२.०४.२०२५ (म.पू.) रुजू झाले आहेत. सदर ३ उमेदवारांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० अंतर्गत प्रशिक्षण सुरु झाले आहे.

| अ.क्र. | शिफारस क्र. | परिवीक्षाधीन कक्ष अधिकाऱ्यांचे नाव | उमेदवाराचा मुळ जात प्रवर्ग | शिफारस प्राप्त प्रवर्ग |
|---|---|---|---|---|
| १ | १ | श्रीकांत रमेश दराडे | NT-D | Open General |
| २ | २ | शुभम पंडीतराव पाटील | EWS | EWS General |
| ३ | ३ | सायली संताजीराव देसाई | EWS Female | Open Female |

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी रूजू झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट-ब संवर्गातील ३ उमेदवारांकरिता सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर एस-१७ (४७६००-१५११००) मध्ये एकूण ३ अधिसंख्य पदे दि.०२.०४.२०२५ ते दि.०१.०४.२०२७ या दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर ३ अधिसंख्य पदे सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

४. मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट-ब संवर्गातील सदर ३ अधिसंख्य पदांच्या दि.०२.०४.२०२५ ते दि.०१.०४.२०२७ या दोन वर्षाच्या कालावधीतील वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक ए-४, २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय, (००) (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य), (२०५२ ००२५)-०१ वेतन या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश दिनांक २१.०२.२०२५ अन्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० बाबत सूचना निर्गमित केल्या असून परिवीक्षाधीन प्रशिक्षणार्थींच्या वेतनाबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट-ब संवर्गातील ३ उमेदवारांच्या परिवीक्षाधीन कालावधीतील वेतनासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेशित करण्यात येत आहे:-

अ) सीपीटीपी-१० अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या परिवीक्षाधीन कक्ष अधिकारी गट-ब या संवर्गातील ३ प्रशिक्षणार्थी परिवीक्षाधीन उमेदवारांच्या वेतनासाठी कक्ष अधिकारी/अवर सचिव (रोख शाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

ब) सीपीटीपी-१० अंतर्गत प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रुजू झालेल्या परिवीक्षाधीन कक्ष अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या पहिल्या महिन्यापासून ज्या दिनांकापासून ते रुजू झाले त्या दिनांकापासून नियमित वेतन प्रदान करण्यात यावे.

क) सीपीटीपी-१० अंतर्गत प्रशिक्षणास रुजू होणाऱ्या परिवीक्षाधीन कक्ष अधिकाऱ्यांची सेवापुस्तके तयार करणे, सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, त्यांचे एनपीएस करीता खाते उघडणे व तसेच अन्य अनुषंगिक बाबी पूर्ण करणे इ. कार्यवाही करावी.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१६१४५५३३३९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.04.16 14:56:36 +05'30'

**( ग. स. परब )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. सह सचिव ( प्रशिक्षण-३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी/अवर सचिव (रोख शाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. (आवश्यक कार्यवाहीकरिता)
११. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
१२. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती.